मेक इन महाराष्ट्रा व डिजीटल इंडिया मिशन राबविण्याच्या अनुषंगाने कामगार विभागामार्फत राबविण्यात येणाऱे अधिनियम /नियम यामध्ये सुधारणा करणे व त्या अंतर्गत प्रक्रियांचे सुलभीकरण करणे, यासाठी समिती स्थापन करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

उद्योग, उर्जा व कामगार विभाग

शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१५/प्र.क्र. १०७/कामगार ९

मंत्रालय विस्तार, मुंबई ३२

दिनांक : १२ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :** **१) शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्रमांक ई-गर्व्हनन्स-२०१५/प्र.क्र. ९/प्रशासन -२ दिनांक ३० जानेवारी, २०१५**

**२) शासन पूरक पत्र उद्योग, उर्जा व कामगार विभाग क्र. ई-गर्व्हनन्स-२०१५/प्र.क्र. ९/प्रशासन -२ दिनांक ११ मार्च, २०१५**

**प्रस्तावना :**

देशांतर्गत होणारी आर्थिक गुंतवणूक वाढुन, औद्योगिक विकासास चालना मिळावी तसेच देश निर्मिती, रचना व संशोधन यांचे क्षेत्र व्हावे यास्तव केंद्र शासनाने “मेक इन इंडिया” कार्यक्रम अंगिकारला आहे. त्याच धर्तीवर राज्यात देखिल “मेक इन महाराष्ट्र” व “डिजिटल इंडिया” मिशन राबविण्याचा निर्णय राज्य शासनाने घेतला व त्यादृष्टीने कामगार विभागामार्फत राबविण्यात येणारे अधिनियम/ नियमांत सुधारणा/बदल सुचविणे व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचे सुलभीकरण करणे, इ. साठी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीने एकूण २० अधिनियम/नियम व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचा अभ्यास करुन त्यामध्ये सुधारणा/बदल सुचविण्याबाबतचा अहवाल १ महिन्यांत शासनास सादर करणे आवश्यक होते. तथापी सदर कामकाज हे कार्यरत अधिकाऱ्यांना स्वत:चे कामकाज सांभाळून करावयाचे असल्याने तसेच याबाबत मालक/ कामगार संघटना यांच्याकडून प्राप्त झालेल्या सूचना हरकतींचा विचार करणे आवश्यक असल्याने अहवाल सादर करण्यास विलंब होत आहे. ही बाब विचारात घेवून सदर समितीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

राज्यात कामगार विभागामार्फत राबविण्यात येणारे अधिनियम/ नियमांत सुधारणा/बदल सुचविणे व त्या अंतर्गतच्या प्रक्रीयांचे सुलभीकरण करणे, इ. साठी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीस त्यांचा अहवाल सादर

करण्यासाठी ऑगस्ट, २०१५ अखेर पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर समितीने त्यांचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

२. तसेच मुंबई धुम्र उपद्रव अधिनियम, १९१२ व महाराष्ट्र मितोपयोजक अधिनियम, १९६५ हे दोन अधिनियम कामगार विभागाच्या कक्षेत येत नसल्याने सदर अधिनियम समितीस देण्यात आलेल्या कार्यकक्षेतून वगळण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५१०१२११५१५४२६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha M Bharose

Digitally signed by Varsha M Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca6972491623e0, cn=Varsha M Bharose
Date: 2015.10.12 12:46:42 +05'30'

(व.मुं. भरोसे)
उप सचिव (कामगार व प्रशासन)

प्रत :

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ३२.
६. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
७. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९. कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. विकास आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
११. विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन, भूखंड क्र. सी-२०, ब्लॉक इ, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
१२. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, भूखंड क्र. सी-२०, ब्लॉक इ, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
१३. संचालक, बाष्पके संचालनालय, कामगार भवन, भूखंड क्र. सी-२०, ब्लॉक इ, बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
१४. प्रबंधक, औद्योगिक न्यायालये, प्रशाकसीय इमारत, पहिला मजला, बांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
१५. संचालक, कै. नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, दादाभाई चमारबागवाला मार्ग, परेल, मुंबई १२.

१६. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.

१७.प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांचे स्वीय सहाय्यक

१८. निवडनस्ती